**१५ व्या केंद्रीय वित्त आयोगाचा निधी जिल्हा परिषद, पंचायत समिती आणि ग्रामपंचायतींना वितरीत करण्यासाठी आयसीआयसीआय (ICICI) बँकेत खाते उघडल्यानंतर करावयाच्या कार्यवाहीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : पंविआ-२०२१/प्र.क्र.१४७/वित्त-४**

बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, फोर्ट,
मुंबई- ४०० ००१
दिनांक : ०६ ऑक्टोंबर, २०२१.

संदर्भ - शासन निर्णय क्र. पीईएस-४५२१/प्र.क्र.५०/आसक दि.२६.०८.२०२१

**शासन परिपत्रक :-**

१५ व्या केंद्रीय वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार केंद्रशासनाद्वारे प्राप्त झालेला आर्थिक वर्ष २०२०-२१ च्या बंधित आणि अबंधित ग्रँटच्या स्वरूपात प्रत्येकी रु. २९१३.५० कोटी असे एकूण रु.५८२७ कोटी इतका निधी आणि आर्थिक वर्ष २०२१-२२ चा अबंधित ग्रँटच्या स्वरूपात रू. ८६१.४० कोटी इतका निधी ग्रामीण स्थानिक स्वराज्य संस्थांच्या तिन्ही स्तरांवर (जिल्हा परिषद, पंचायत समिती आणि ग्रामपंचायती) वितरीत करण्यात आला आहे. केंद्र शासनाद्वारे स्थानिक स्वराज्य संस्थांना देण्यात येणाऱ्या निधी Public Finance Management System (PFMS) प्रणालीद्वारे वितरीत करणे बंधनकारक केले आहे. तसेच सदर निधी थेट लाभार्थ्यांपर्यंत पोहोचविण्यासाठी PRIASoft-PFMS या दोन प्रणालींचे इंटिग्रेशन केले आहे.

केंद्र शासनाच्या ई-ग्राम स्वराज पोर्टल वर PRIASoft या प्रणालीमध्ये ग्रामपंचायत /पंचायत समिती/ जिल्हा परिषदांच्या वार्षिक लेख्यांची नोंद घेण्यात येते. सदर प्रणालीमध्ये Day book, Month book, Year book या ३ टप्प्यांमध्ये नोंदी घेतल्यानंतर त्या त्या वर्षीचे लेखे पूर्ण केले जातात. केंद्रशासनाने पंधराव्या वित्त आयोगाच्या निधीचे वितरण व खर्च PFMS या प्रणालीवरूनच करणेबाबत बंधनकारक केले आहे. तसेच PFMS आणि PRIASoft दोन्ही प्रणाली एकमेकांशी संलग्न (Integrate) केल्या आहेत. त्यामुळे PRIASoft या प्रणालीवरील मागील सर्व नोंदी अद्ययावत केल्याशिवाय PFMS प्रणालीवर १५ व्या केंद्रीय वित्त आयोगाचा निधी खर्च करणे शक्य होणार नाही.

१५ व्या केंद्रीय वित्त आयोगाचा निधी जिल्हा परिषद, पंचायत समिती आणि ग्रामपंचायतींना वितरीत करण्यासाठी ICICI बँकेमार्फत PRIASoft-PFMS (PPI) Solution उपलब्ध करून घेणेबाबत शासन निर्णय क्र. पीईएस-४५२१/प्र.क्र.५०/आसक दि.२६.०८.२०२१ निर्गमित करण्यात आला आहे. त्यानुसार १५व्या

केंद्रीय वित्त आयोगाकडून राज्य शासनास प्राप्त झालेला निधी ICICI बँकेमार्फत Public Finance Management System (PFMS) प्रणालीद्वारे राज्यातील ग्रामीण स्थानिक स्वराज्य संस्थांना वितरीत करण्यात येणार आहे.

ई-ग्राम स्वराज पोर्टलवर Receipt voucher entry विहित वेळेत झाली नसल्याने वार्षिक लेखे बंद करण्यास अडचणी येत होत्या. यासंदर्भात राज्य शासनाने पंचायती राज मंत्रालय, दिल्ली यांना केलेल्या विनंतीच्या अनुषंगाने पंचायती राज मंत्रालय, दिल्ली यांच्याव्दारे ई-ग्राम स्वराज पोर्टलवर Receipt voucher entry करण्याची सुविधा दि.११.८.२०२१ ते दि.१८.८.२०२१ पर्यंत उपलब्ध करण्यात आली होती. याबाबत राज्यातील ग्रामीण स्थानिक स्वराज्य संस्थांना शासन परिपत्रक क्र. पिईएस-२३२०/प्र.क्र.२२/आसक दि. ११ ऑगस्ट, २०२१ अन्वये अवगत करण्यात आले होते. परंतू सद्यस्थितीचे अवलोकन केले असता असे लक्षात आले आहे की, काही ग्रामीण स्थानिक स्वराज्य संस्थांनी विहीत वेळेत Receipt voucher entry बाबतची कार्यवाही अद्यापि पूर्ण केलेली नाही.

तथापि १५व्या केंद्रीय वित्त आयोगांतर्गत प्राप्त निधीचा वापर विनाविलंब राज्यातील ग्रामीण स्थानिक स्वराज्य संस्थांच्या सक्षमीकरणासाठी करण्यात यावा यासाठी ज्या स्थानिक स्वराज्य संस्थांनी Receipt voucher entry बाबतची कार्यवाही पूर्ण केलेली नाही, त्यांनी १५ व्या केंद्रीय वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार केंद्रशासनाद्वारे आर्थिक वर्ष २०२०-२०२१ मध्ये बंधित आणि अबंधित ग्रँटच्या स्वरूपात प्राप्त झालेला निधी तसेच, आर्थिक वर्ष २०२१-२२ मध्ये अबंधित ग्रँटच्या स्वरूपात प्राप्त झालेला निधी, संबंधित स्थानिक स्वराज्य संस्थांनी " उप सचिव (वित्त) १५ वा वित्त आयोग, ग्रामविकास विभाग, महाराष्ट्र राज्य " [DEPUTY SECRETARY (FIN) 15 TH FINANCE COMMISSION RDD MAHA STATE ] या नावे ICICI बँकेत उघडलेल्या बॅक खाते क्रमांक ००३८०१०३९५१९, IFS code - ICIC००००0३८ या १५ व्या वित्त आयोगाच्या बचत खात्यामध्ये फक्त RTGS किवा NEFT व्दारे जमा करावे (धनादेशाव्दारे जमा करू नयेत) व त्याचा UTR number शासनास sofin4.rdd-mh@nic.in या ईमेलवर कळविण्यात यावा. तदनंतर सदर निधी ICICI बँकेमार्फ़त PFMS प्रणालीद्वारे संबंधित ग्रामीण स्थानिक स्वराज्य संस्थांना पुन: वितरीत करण्यात येईल.

ज्या स्थानिक स्वराज्य संस्थांनी Receipt voucher entry बाबतची कार्यवाही पूर्ण केलेली आहे त्यांनी सदर निधी शासन निर्णय क्र. पीईएस-४५२१/प्र.क्र.५०/आसक दि.२६.०८.२०२१ अन्वये उघडण्यात आलेल्या संबंधित ग्रामीण स्थानिक स्वराज्य संस्थांच्या ICICI बँकेच्या खात्यामध्ये जमा करण्याची कार्यवाही RTGS/ NEFT किंवा धनादेशाव्दारे त्वरीत पूर्ण करावी.

उपरोक्त कार्यवाही पुर्ण झाल्यावर जुनी बँक खाती त्वरीत बंद करण्यात यावी आणि जुनी बँक खाती PFMS प्रणालीमध्ये Deactivate करुन Deactivate केलेल्या बँक खात्याचा तपशिल व Unique Code ची माहिती शासनास sofin4.rdd-mh@nic.in या ईमेलवर तात्काळ पाठवावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईट (www.maharashtra.gov.in) उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२११००११४४७२०३४२० असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRAVIN DEVICHAND JAIN

Digitally signed by PRAVIN DEVICHAND JAIN
DN: cn=PRAVIN DEVICHAND JAIN, o=Rural Development Department, ou, email=pravin.jain@nic.in, c=IN
Date: 2021.10.06 16:25:30 +05'30'

( प्रविण देविचंद जैन )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व) ,
२. उपमुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत), जिल्हा परिषद (सर्व),
३. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व),

प्रत माहितीसाठी,

१. मा.मंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव
२. मा.राज्यमंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव
३. मा.अ.मु.स. (ग्रा.वि व पं.रा) यांचे स्वीय सहायक
४. आपले सरकार कक्ष, ग्रामविकास विभाग
५. निवडनस्ती कार्यासन वित्त - ४